महाराष्ट्र फुटबॉल मिशन १ मिलियन
कार्यक्रमाच्या अंमलबजावणीबाबत

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन परिपत्रक क्र.बैठक २०१७/प्र.क्र. १२२/क्रीयुसे-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०१ सप्टेंबर, २०१७

संदर्भ :- शा.शि.व क्री.वि. शासन निर्णय क्र.फिफामी २०१७/ प्र.क्र. १००/क्रीयुसे-१,
दि. ७ जुलै, २०१७.

**प्रस्तावना :-**

मा.प्रधानमंत्री यांनी भारतामध्ये फिफा अंडर १७ या होणाऱ्या जागतिक फुटबॉल स्पर्धेच्या अनुषंगाने देशात मिशन ११ मिलियन कार्यक्रम राबविण्यात येत असून, या स्पर्धांमधील काही स्पर्धा महाराष्ट्रामध्ये डी.वाय. पाटील स्टेडीयम, नवी मुंबई येथे होणार आहेत. राज्यात फुटबॉल खेळाची आवड निर्माण व्हावी, जास्तीत जास्त मुलांनी मैदानावर खेळ खेळल्यास त्यांचे आरोग्य सुदृढ होण्यास मदत होईल या विचाराने राज्य शासनाने “फुटबॉल मिशन १ मिलियन” कार्यक्रम जाहीर केला असून या कार्यक्रमांतर्गत अंदाजे २५ हजार शाळांना/ महाविद्यालयांना फुटबॉलचे वाटप करण्यात येणार आहे व मुलांमध्ये खेळाची आवड निर्माण होण्यासाठी सर्व शाळांमधून आठवडयातून कमीत कमी ३ दिवस मैदानी खेळाला प्रोत्साहन दिले जावे असे अपेक्षित आहे. फुटबॉल स्पर्धांच्या निमित्ताने दि. १५ सप्टेंबर २०१७ रोजी “फुटबॉल फेस्टीवल” साजरा करण्यासाठी जास्तीत जास्त मुलांनी फुटबॉल खेळण्यासाठी मैदानात उतरावे. यासाठी खालीलप्रमाणे सूचना सर्व शाळांना देण्यात येत आहे.

**शासन परिपत्रक :-**

“फुटबॉल मिशन १ मिलियन” हा कार्यक्रम राबविण्यासाठी ज्या शाळांचे स्वत:चे खेळाचे मैदान आहे अशा शाळांची यू-डायस प्रणालीप्रमाणे यादी सर्व जिल्हा क्रीडा अधिकारी व शिक्षणाधिकारी (माध्यमिक / प्राथमिक) यांच्याकडे उपलब्ध करुन दिली आहे. राज्यात २४,७५२ इतक्या मैदान असलेल्या उच्च प्राथमिक / माध्यमिक/ उच्च माध्यमिक शाळा असून या शाळांमध्ये S.S.C/ C.B.S.E./I.C.S.E./ I.G.C.S.E./ I.B अभ्यासक्रम शिकविण्यात येतात. या सर्व शाळांचा सहभाग घेऊन कार्यक्रमाची अंमलबजावणी करण्यासाठी खालीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत त्याचे पालन सर्व शाळांच्या प्रमुखांनी / प्राचार्य/ मुख्याध्यापक यांनी करावी.

१) सर्व शाळांनी शाळेतील विद्यार्थी / विद्यार्थिनी यांचा फुटबॉलचा संघ ६ सप्टेंबर, २०१७ पर्यंत तयार करावा, ज्या शाळेत मुलामुलींची संख्या जास्त असेल त्या शाळेत जास्तीत जास्त मुलामुलींनी फुटबॉल खेळण्यामध्ये सहभाग घ्यावा यासाठी त्या ठिकाणी एकापेक्षा जास्त संघ तयार करावेत.

२) संघामध्ये समावेश करण्यात आलेले विद्यार्थी / विद्यार्थिनींची स्वतंत्र यादी शिक्षणाधिकारी (माध्यमिक / प्राथमिक) तसेच जिल्हा क्रीडा अधिकारी यांना उपलब्ध करुन दयावी. सदरची यादी https://www.research.net/r/1million या link वर उपलब्ध करुन दयावी.

३) C.B.S.E./ I.C.S.E./ I.G.C.S.E./ I.B अभ्यासक्रम असलेल्या सर्व इंग्रजी माध्यमाच्या शाळांमध्ये मुख्याध्यापकांनी शाळेतील विद्यार्थ्यांची यादी सुध्दा शिक्षणाधिकारी (माध्यमिक / प्राथमिक) व जिल्हा क्रीडा अधिकारी यांना उपलब्ध करुन दयावी व आपला सहभाग नोंदवावा.

४) शिक्षणाधिकारी (माध्यमिक / प्राथमिक) व जिल्हा क्रीडा अधिकारी यांनी यू डायसनुसार त्यांना उपलब्ध करुन देण्यात आलेल्या यादीतील शाळा व लिंकवर नोंदणी करण्यात आलेल्या शाळा यांची खातरजमा करुन फुटबॉल वाटपासाठी शाळांची अंतिम यादी दि.६ सप्टेंबर, २०१७ पूर्वी तयार करावी.

५) जिल्हा क्रीडा अधिकारी व शिक्षणाधिकारी (माध्यमिक / प्राथमिक) यांनी सर्व शारिरिक शिक्षकांची बैठक १० सप्टेंबर २०१७ पूर्वी घ्यावी. या बैठकीमध्ये दि. १५ सप्टेंबर, २०१७ रोजी जास्तीत जास्त मुले मैदानावर फुटबॉल खेळतील यासाठी केंद्र प्रमुखांसोबत नियोजन करावे. १५ सप्टेंबरला जेव्हा मुले / मुली फुटबॉल खेळण्यासाठी मैदानावर येतील तेव्हा अन्य मुलांना फिफामध्ये सहभागी होणाऱ्या संघासाठी शुभेच्छा संदेश/ कार्ड तयार करणे, निबंध स्पर्धा, चित्रकला स्पर्धा अथवा फुटबॉल खेळाशी संबंधित अन्य उपक्रमांमध्ये सहभागी करुन घ्यावे. सदर शुभेच्छा संदेश, शुभेच्छा कार्ड संकलित स्वरुपात तयार करुन ते संदेश जिल्हा क्रीडा अधिकारी यांच्याकडे पाठविण्याची व्यवस्था करावी. ते संदेश भारतीय संघापर्यंत पोहोचण्याची आवश्यक ती कार्यवाही जिल्हा क्रीडा अधिकारी व तत्सम अधिकारी करतील.

६) जिल्हा क्रीडा अधिकाऱ्यांनी त्यांच्या जिल्हयातील क्रीडा शिक्षकांमधून फुटबॉल खेळामध्ये तज्ञ असलेल्या व मार्गदर्शन करणाऱ्या प्रशिक्षकांची यादी ६ सप्टेंबर, २०१७ पर्यंत तयार करावी व ती आयुक्त (क्रीडा) यांना पाठवावी. निवड केलेल्या संघातील सर्व खेळाडू दि.१५ सप्टेंबर, २०१७ रोजी मैदानावर फुटबॉल खेळतील याची दक्षता संबंधित मुख्याध्यापक / प्राचार्यांनी घ्यावी. दि. १५ सप्टेंबर या तारखेला किती विद्यार्थी प्रत्यक्ष मैदानावर फुटबॉल खेळले याची माहिती जिल्हा

क्रीडा अधिकारी व शिक्षणाधिकारी (माध्यमिक / प्राथमिक) यांना मुख्याध्यापकांनी सादर करावी. तसेच सदर उपक्रमाचे फोटो/ व्हिडिओ maharashtrafootball@gmail.com या ई-मेल वरसुध्दा पाठवावेत.

(७) इंग्रजी माध्यमांच्या शाळांमधून तसेच सैनिकी शाळांमधून फुटबॉल खेळाला प्रोत्साहन देण्यात येते. सबब या शाळेमधील तज्ञ क्रीडा शिक्षकांचे मार्गदर्शन जिल्हयातील इतर शाळांमधील शिक्षकांना तसेच खेळाडूंना उपलब्ध करुन दयावे.

८) दि.१५ सप्टेंबर, २०१७ पूर्वी खेळाचे प्राथमिक धडे घेण्यासाठी सर्व शाळांतील क्रीडा शिक्षकांनी निवड करण्यात आलेल्या संघातील मुलांना त्यांच्या सोयीच्या वेळेनुसार मैदानावर प्राथमिक धडे दयावेत.

९) ज्या शाळा फुटबॉल संघ तयार करतील त्यांना त्यांच्या शाळेतील विद्यार्थ्यांची तयार केलेली यादी आयुक्त (क्रीडा), महाराष्ट्र राज्य यांच्या स्तरावर दररोज संकलित करावयाची असून त्यांना संकलित करुन दिलेल्या माहितीचा अहवाल दररोज उप सचिव (क्रीडा) व मा.मंत्री (क्रीडा) यांना सादर करावयाचा आहे.

१०) फिफा अंडर १७ या फुटबॉल स्पर्धांच्या अनुषंगाने जास्तीत जास्त शाळांमध्ये सेल्फी पॉईंट तयार करावेत.

११) दि.१५.०९.२०१७ रोजी सुरु होणाऱ्या “महाराष्ट्र फुटबॉल मिशन १ मिलियन” या कार्यक्रमात सहभागी होणारी मुले त्यानंतर नियमित फुटबॉल खेळतील याकडे विशेष लक्ष देणे आवश्यक आहे. फिफा अंडर १७ या जागतिक स्पर्धा दि. ६ ऑक्टोबर, २०१७ रोजी सुरु होणार आहे.

वरील सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. या सूचना महाविद्यालयांना सुध्दा लागू राहतील. या सूचना सर्व प्राचार्य व मुख्याध्यापक यांच्या निदर्शनास आणण्यात याव्यात.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१७०९०४१५२७१८९३२१ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Rajendra Shankarrao Pawar

Digitally signed by Rajendra Shankarrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, cn=Rajendra Shankarrao Pawar
Date: 2017.09.04 15:16:49 +05'30'

**(राजेंद्र पवार)**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. आयुक्त (क्रीडा), क्रीडा व युवकसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे

२. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे,

३. संचालक (उच्च शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
४. संचालक (तंत्र शिक्षण), महाराष्ट्र राज्य, मुंबई,
५. संचालक (व्यवसाय शिक्षण), महाराष्ट्र राज्य, मुंबई,
६. संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) महाराष्ट्र राज्य, पुणे
७. संचालक ( प्राथमिक) महाराष्ट्र राज्य, पुणे
८. सह संचालक (क्रीडा) क्रीडा व युवकसेवा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
९. सर्व उपसंचालक (क्रीडा), महाराष्ट्र राज्य, पुणे
१०. सर्व उपसंचालक (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
११. सर्व जिल्हा क्रीडा अधिकारी, महाराष्ट्र राज्य, पुणे
१२. सर्व शिक्षणाधिकारी (माध्यमिक / प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
१३. राज्य चिटणीस, महाराष्ट्र राज्य, भारत स्काऊटस् आणि गाईडस्, मुंबई.
१४. अतिरिक्त महासंचालक, राष्ट्रीय छात्र सेना, मुंबई.
१५. मां.मंत्री (शालेय शिक्षण व क्रीडा) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१६. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय,मुंबई,
१७. सह सचिव , उप सचिव (प्रशासन/विद्यार्थी विकास/ शिक्षक व शिक्षकेतर/ शाळा व्यवस्थापन), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१८. निवडनस्ती

## विवरणपत्र-अ

## युडायस प्रणालीमध्ये नोंद असलेल्या राज्यातील जिल्हानिहाय शाळांची संख्या

| अ.क्र. | विभाग | जिल्हा | युडायस मध्ये नमुद शाळांची संख्या | जिल्हानिहाय वाटप करण्यात येणारी फुटबॉल संख्या (प्रतिशाळा ३ प्रमाणे) |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | मुंबई | पालघर | ५६१ | १६८३ |
| | | मुंबई शहर | १६७ | ५०१ |
| | | मुंबई उपनगर | १६६१ | ४९८३ |
| | | ठाणे | १३९५ | ४१८५ |
| | | रायगड | ५७४ | १७२२ |
| २ | पुणे | पुणे | १६८९ | ५०६७ |
| | | अहमदनगर | १११६ | ३३४८ |
| | | सोलापूर | १०१७ | ३०५१ |
| ३ | नाशिक | नाशिक | ११२२ | ३३६६ |
| | | धुळे | ४८३ | १४४९ |
| | | नंदुरबार | ३८७ | ११६१ |
| | | जळगांव | ८३८ | २५१४ |
| ४ | कोल्हापूर | कोल्हापूर | ९४० | २८२० |
| | | सांगली | ७०८ | २१२४ |
| | | सातारा | ७६६ | २२९८ |
| | | रत्नागिरी | ४३७ | १३११ |
| | | सिंधुदुर्ग | २४७ | ७४१ |
| ५ | औरंगाबाद | औरंगाबाद | ९५८ | २८७४ |
| | | जालना | ४३५ | १३०५ |
| | | परभणी | ५३० | १५९० |
| | | हिंगोली | २३९ | ७१७ |
| | | बीड | ६९३ | २०७९ |
| ६ | लातूर | लातूर | ७०८ | २१२४ |
| | | नांदेड | ७१९ | २१५७ |
| | | उस्मानाबाद | ४६७ | १४०१ |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ७ | नागपूर | नागपूर | १०८९ | ३२६७ |
| | | वर्धा | ३३३ | ९९९ |
| | | भंडारा | ३३० | ९९० |
| | | गोंदिया | ३८० | ११४० |
| | | गडचिरोली | ३५३ | १०५९ |
| | | चंद्रपूर | ५७० | १७१० |
| ८ | अमरावती | अमरावती | ७१९ | २१५७ |
| | | अकोला | ४९७ | १४९१ |
| | | वाशिम | ३१८ | ९५४ |
| | | यवतमाळ | ७१९ | २१५७ |
| | | बुलढाणा | ५८७ | १७६१ |
| | **एकूण** | | **२४७५२** | **७४२५६** |